आमदार निवास, नागपूर व रविभवन, नागपूर येथील कक्षांचे आरक्षण विविध संस्थांना उपलब्ध करुन देणेबाबत ---

महाराष्ट्र शासन
सार्वजनिक बांधकाम विभाग,
शासन परिपत्रक क्रमांक : आरक्षण-१९१८/प्र.क्र.२२७/मिव्य-२
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :१३.१२.२०१८

<u>वाचा</u> :-१) सा.बां.वि., शा. नि. क्रमांक : एसीडी-२०००/प्र.क्र.३०/मि.व्य.२, दिनांक २७.०६.२०००.
२) सा.बां.वि.,शा.नि.क्रमांकः आरक्षण-२००२/ प्र.क्र. १२६/ मि.व्य.-२,दि.३१.०७.२००३.
३) सा.बां.वि.,शा.नि.क्रमांकः आरक्षण-२०१५/ प्र.क्र. २६/ मि.व्य.-२,दि.२८.०५.२०१५.

<u>प्रस्तावना :-</u>

आमदार निवास नागपूर व रविभवन, नागपूर या शासकीय विश्रामगृहांमधील कक्षांच्या आरक्षणाकरीता विविध संस्थांकडून त्यांच्या मार्फत आयोजित विविध कार्यक्रमांकरीता मागणी होत असते. उपरोक्त नमूद दि.२७.०६.२००० च्या शासन निर्णयामधील तरतुदींनुसार आमदार निवास,नागपूर व रविभवन,नागपूर या शासकीय विश्रामगृहांमधील खोल्यांचे एका व्यक्ती/ संस्थेसाठी, एका कार्यक्रमासाठी / एका कालावधीसाठी २० पेक्षा जास्त खोल्यांचे आरक्षण द्यावयाचे असल्यास कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग क्र.१, नागपूर यांच्याकडून प्रस्ताव मान्यतेसाठी शासनास सादर होत असतात. विविध संस्थांची वाढती मागणी लक्षात घेता, व यासंदर्भात शासनास प्राप्त होणा-या प्रस्तावांची कार्यवाही करण्यास व शासन मान्यता देण्यामध्ये मोठ्या प्रमाणात पत्रव्यवहार व कालापव्यय होत असल्याचे निदर्शनास आले आहे. त्यामुळे आमदार निवास, नागपूर व रविभवन, नागपूर येथील खोल्यांच्या आरक्षणाबाबत नवीन धोरण निश्चित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

<u>शासन परिपत्रक :-</u>

१) वरील बाबींचा सांगोपांग विचार करुन शासनाने असा निर्णय घेतला आहे की, शा.नि. दि.२७.०६.२००० मधील, --*विशेष बाब म्हणून सदर कक्षबंध भाड्याने द्यावयाचे झाल्यास शासनाची पूर्वपरवानगी घेण्यात यावी.तसेच आमदार निवास,सुयोग येथील खोल्या एका व्यक्तीसाठी एका कार्यक्रमासाठी/ एका कालावधीसाठी जास्तीत जास्त २० पर्यंत देण्यात याव्यात.*'' ही तरतुद या शासन परिपत्रकान्वये रद्द करण्यात येत असून आमदार निवास, नागपूर व रविभवन, नागपूर या शासकीय विश्रामगृहांमधील कक्षांचे आरक्षण एक व्यक्ती /संस्थेस, एका कार्यक्रमासाठी / एका कालावधीसाठी उपलब्ध करुन देताना पुढील अधिकार देण्यात येत असून त्या प्रमाणे कार्यवाही करण्यात यावी :-

| अ.क्र. | कक्ष आरक्षणास मान्यता देणारा अधिकारी | कक्ष संख्या |
|---|---|---|
| १ | कार्यकारी अभियंता,सा.बां.वि.क्र.१,नागपूर. | ००१ ते १०० कक्षसंख्येसाठी. |
| २ | अधिक्षक अभियंता,सा.बां.मंडळ,नागपूर. | १०१ ते २०० कक्षसंख्येसाठी. |
| ३ | मुख्य अभियंता,सा.बां.प्रादेशिक विभाग,नागपूर. | २०१ व त्यापुढील कक्षसंख्येसाठी. |

२) शासन निर्णय क्र.आरक्षण-२००२/ प्र.क्र.१२६/ मिव्य-२,दि.३१.०७.२००३ मधील सूचना संक्षिप्तपणे खालीलप्रमाणे असून,विश्रामगृहांचे आरक्षण देताना दि.३१.०७.२००३ मधील सविस्तर सुचनांचे काटेकोरपणे पालन करावे.शा.नि.दि.३१.०७.२००३ मधील सूचना संक्षिप्त स्वरुपात §

अ) विश्रामगृहातील कक्षाचे आरक्षण करताना शा.नि.दि.३१.०७.२००३ मधील परिच्छेद क्र.३ मध्ये नमुद केलेला अग्रक्रम/ प्राधान्यक्रम कटाक्षाने पाळण्यात यावा.

ब) विश्रामगृहाच्या आरक्षणासाठी शक्यतो किमान सात दिवसांपूर्वी संबंधित कार्यकारी अभियंता यांना लेखी कळविणे आवश्यक आहे.

क) आरक्षण जास्तीत जास्त ०७(सात) दिवासांपर्यंतच करण्यात येईल.सकाळी ९.०० वा.पासून दुस-या दिवशी सकाळी ९.०० वाजेपर्यंतचा कालावधी आरक्षणाचा एक दिवस म्हणून समजण्यात येईल.

ड) कक्ष आरक्षित केल्यापासून(ज्या कालावधीसाठी कक्ष आरक्षण हवे आहे,तो कालावधी सुरु झाल्यापासून) २४ तासाचे आत कक्ष ताब्यात घेतला नाही तर आरक्षण आपोआप रद्द होईल.कक्षबंधाचा गैरवापर आढळल्यास आरक्षण त्वरित रद्द केले जाईल.

३) विविध विधीमंडळ समित्या, केंद्र शासनाच्या विविध संसदीय समित्या व इतर राज्यांच्या विधीमंडळ समित्या यांच्या दौ-याच्या कालावधीत सदर समित्यांसाठी प्राधान्याने कक्ष आरक्षित करणे आवश्यक असल्याने, वरील परि.१ मध्ये नमुद केलेल्या आरक्षण मान्यतेची कार्यवाही करताना, सदर समित्यांसाठीचे कक्ष आरक्षणाबाबत प्रथम विचार व्हावा. तद्‌नंतर उर्वरित उपलब्ध कक्षांचे आरक्षण संस्थांसाठी उपलब्ध करुन द्यावे.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१८१२१३१२०८४५१७१८ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Vijay Ganpat Amolkar

Digitally signed by Vijay Ganpat Amolkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9b318a02c11010fd64b8388360e99c8c5215344dcffab2e51e83ca657ad934a2, serialNumber=abf9a2db008fa8b299e7c58cc513eb8a2cb4ea7441f3ad255a51ae4d3bfdeaa2, cn=Vijay Ganpat Amolkar
Date: 2018.12.13 12:12:27 +05'30'

**( विजय अमोलकर )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत :-**

१. महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई,

२. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,

३. सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
४. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,
५. सर्व मंत्रालयीन विभागांचे सर्व अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव,
६. सर्व मंत्रालयीन विभाग,
७. सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधानसभा), मुंबई,
८. सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधानपरिषद), मुंबई,
९. सर्व विभागीय आयुक्त,
१०.सर्व जिल्हाधिकारी / निवासी उप जिल्हाधिकारी,
११.मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नागपूर,
१२.अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नागपूर,
१३.कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग क्र.१, नागपूर,
१४.सार्वजनिक बांधकाम विभागाच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
१५.सार्वजनिक बांधकाम विभागातील सर्व कार्यासने.
१६.निवडनस्ती / मिव्य-२.